**संग्राम प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी दि. ३१ ऑक्टोबर २०१५ पर्यंत मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संग्राम-२०१५/प्र.क्र.४७/संग्राम कक्ष**
**बांधकाम भवन, मर्झबान पथ,**
**मंत्रालय, मुंबई -४०० ००१**
तारीख: ८ ऑक्टोबर २०१५

## वाचा

1. **शासन परिपत्रक क्र. संग्राम-२०१५/प्र.क्र.४७/संग्राम कक्ष दि. १४ मे २०१५**
2. **शासन परिपत्रक क्र. तेविआ-२०१४/प्र.क्र.४५/वित्त-४ दि. २२ सप्टेंबर २०१५**

## प्रस्तावना

ई-पंचायत हा एक मिशनमोड प्रकल्प आहे. या प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी १३ व्या वित्त आयोगाचा निधी वापरण्याच्या मार्गदर्शक सूचना आहेत. १३ व्या वित्त आयोगाचा निधी वापरास व प्रचलित धोरणानुसार ई-पंचायत प्रकल्प अंमलबजावणीस शासन परिपत्रक क्र. संग्राम-२०१५/प्र.क्र.४७/संग्राम कक्ष दि. १४ मे २०१५ नुसार ३० सप्टेंबर २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता शासन परिपत्रक क्र. तेविआ-२०१४/प्र.क्र.४५/वित्त-४ दि. २२ सप्टेंबर २०१५ नुसार १३ व्या वित्त आयोगाच्या निधीच्या वापरास दि. ३१ डिसेंबर २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. संग्राम प्रकल्पाच्या अंमलबजावणीचे सुधारीत धोरण ठरविण्याची प्रक्रिया सुरू झालेली आहे. सुधारीत धोरण तयार होऊन अंमलबजावणीसाठी आणखी काही कालावधी लागण्याची शक्यता लक्षात घेता, प्रचलित धोरणानुसार ई-पंचायत/ संग्राम प्रकल्प अंमलबजावणी करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक

**१) संग्राम प्रकल्प मुदतवाढ :-**

१.१ संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र. संग्राम-२०१५/प्र.क्र.४७/संग्राम कक्ष दि. १४ मे २०१५ मधील मुद्दा क्र. १ व मुद्दा क्र. २ मध्ये नमूद केलेल्या सूचनांनुसार सर्व जिल्हा परिषदांनी संग्राम प्रकल्प अंमलबजावणीसाठी १३ व्या वित्त आयोगातून निधी राखून ठेवण्याबाबतच्या सुस्पष्ट सूचना देण्यात आलेल्या आहेत.

१.२ संग्राम-२ प्रकल्पाचे सुधारीत धोरण ठरविण्याबाबतची कार्यवाही सुरू असल्याने यापूर्वी माहे सप्टेंबर २०१५ पर्यंत प्रकल्प अंमलबजावणीस मुदतवाढ दिली होती.

१.३ **सदयस्थितीत संग्राम प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी दि. ३१ ऑक्टोबर २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.**

**२) संग्राम प्रकल्प अंमलबजावणीसाठी राखीव निधी :-**

२.१ संग्राम-२ साठीच्या सूचना प्राप्त होईपर्यंत अजूनही काही कालावधी (साधारणपणे २-३ महिने) लागण्याची शक्यता लक्षात घेऊन तोपर्यंच्या कालावधीसाठीही जिल्हा परिषदांनी प्रचलित धोरणानुसार १३ व्या वित्त आयोगातून पुरेसा निधी राखीव ठेवण्याची तजवीज करणे अनिवार्य राहील.

२.२ संग्राम प्रकल्प अंमलबजावणीसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पुरेसा निधी राखीव राहील, यासाठी मुख्य लेखा व वित्त अधिकारी व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) यांचेशी विचार विनिमय करून त्यासाठी तातडीने आवश्यक ती उपाययोजना करावी.

**३) महाऑनलाईनची जबाबदारी:-**

३.१ महाऑनलाईनने सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील प्रकल्पाच्या अनुषंगिक सर्व १० Module मधील (उदा. प्रियासॉफ्ट, एरिया प्रोफायलर इत्यादी सर्व तसेच संग्रामसॉफ्ट) डेटा एन्ट्रीचे काम संबंधित महिन्यापर्यंत पूर्णपणे अद्ययावत ठेवावे.

३.२ महाऑनलाईनने या प्रकल्पासाठी उपलब्ध करून दिलेल्या तांत्रिक मनुष्यबळाचे मानधन देण्याची संपूर्ण जबाबदारी महाऑनलाईनचीच असल्याने महाऑनलाईनने देखील सर्व तांत्रिक मनुष्यबळाला विहीत मोबदला अदा करण्याची खबरदारी घ्यावी.

३.३ तांत्रिक मनुष्यबळ व त्यांना अदा करावयाचा मोबदला या प्रकरणात काही बाबी उदभवल्यास (न्यायालयीन प्रकरणांसह) त्याचा निपटारा करण्याचीही जबाबदारी महाऑनलाईनची राहील.

**४) महाऑनलाईनने दर्शविलेल्या थकीत रकमा, TDS व चालू देयक अदायगीबाबतची जिल्हा परिषदेची जबाबदारी :-**

४.१ सर्व जिल्हा परिषदांनी या कालावधीत महाऑनलाईनच्या देयक अदायगीबाबत तसेच थकीत रकमांबाबत महाऑनलाईन समवेत संपूर्ण ताळमेळ करून, ताळमेळाअंती चालू देयक तसेच थकबाकी अदायगीबाबतची कार्यवाही पूर्ण करावी.

४.२ **ताळमेळाअंती अनुज्ञेय रकमेबाबतचे किंवा रक्कम अनुज्ञेय नसल्याबाबत तसेही आदेशात नमूद करून अंतिम आदेश (Speaking Order) निर्गमित करणे बंधनकारक आहे.**

४.३ **या सर्व प्रकरणांमध्ये फक्त १३ व्या वित्त आयोगशी निगडीत निधीच वापरणे आवश्यक आहे, अशा स्पष्ट सूचना या परिपत्रकाद्वारे देण्यात येत आहेत.**

४.४ ताळमेळ व थकबाकी अदायगीबाबतच्या सुस्पष्ट सूचना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आहेत. तसेच व्हिडीओ कॉन्फरन्सद्वारेही महाऑनलाईन व जिल्हा परिषद अधिकाऱ्यांना संयुक्तपणे मार्गदर्शन करण्यात आलेले आहे.

४.५ अशा परिस्थितीत **जिल्हा परिषद व महाऑनलाईन यांचे दरम्यान देयक अदायगीच्या, ताळमेळ, TDS, ई-फायलिंग अनुषंगाने कोणतेही न्यायालयीन प्रकरण उदभवल्यास संबंधित जिल्हा परिषद अधिकारी व्यक्तिशः जबाबदार राहतील**, याची नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००८१४२९५२४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V Giriraj

Digitally signed by V Giriraj
DN: c=IN, o=All India Service, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=V Giriraj
Date: 2015.10.12 16:18:25 +05'30'

**(वि. गिरिराज)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय
३. मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
४. मा.उपमुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव
५. शासनाचे मुख्य सचिव
६. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व प्रशासकीय विभाग)
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. सर्व सहसचिव/उपसचिव (ग्रामविकास विभाग)
९. सर्व जिल्हाधिकारी
१०.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
११.सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
१२.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१३.सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (पंचायत/सा.प्र.वि)
१४.सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी
१५.मुख्य परिचालन अधिकारी, महाऑनलाईन
१६.मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
१७.मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
१८. स्वीय सहायक प्रधान सचिव (ग्रा.वि), मा. प्रधान सचिव (ग्रा.वि) यांचे अवलोकनार्थ
१९.निवड नस्ती, संग्राम कक्ष, ग्रामविकास व पंचायत राज विभाग